व्यवसाय सुलभीकरणांतर्गत DPIIT यांनी सूचित केलेल्या सुधारणांवर कार्यवाही करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र.मदुवआ-१२२४/प्र.क्र.५४/कामगार-१०**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २७ जून, २०२४.

संदर्भ:- १) शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१२/कामगार-९, दि.२४/०७/२०१५.
२) शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१२/कामगार-९, दि.११/०३/२०१९.
३) शासन निर्णय क्र.एमएसए-०२/२०१९/प्र.क्र.३४/कामगार-१०, दि.२८/०२/२०१९.
४) कामगार आयुक्त, मुंबई यांचे पत्र क्र.काआ/मदुवआ/अशा.संकिर्ण/३५/२०२३/कार्या-१३ दिनांक २८/०५/२०२४.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ क्र.(३) येथील पत्रान्वये कामगार आयुक्त, मुंबई यांनी व्यवसाय सुलभीकरणांतर्गत महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे व सेवाशर्तीचे विनियमन) नियम, २०१८ च्या नियम-५ मध्ये सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम (नोकरीचे व सेवाशर्तीचे विनियमन) अधिनियम, २०१७ च्या कलम-६(२) मध्ये नोंदणी दाखला मिळणेबाबत अर्ज ऑनलाईन संगणक प्रणालीद्वारे सादर करण्याची तसेच महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे व सेवाशर्तीचे विनियमन) नियम, २०१८ च्या नियम-५ मध्ये आस्थापनेची नोंदणी करावयाची कार्यपध्दती नमूद केलेली आहे. सदरहू मूळ नियमातील तरतुदीनुसार नोंदणीसाठी अर्ज प्राप्त झाल्यानंतर ७ दिवसांत नोंदणी प्रमाणपत्र देणे अपेक्षित होते. तथापि, तदनंतर व्यवसाय सुलभीकरणांतर्गत औद्योगिक धोरण व प्रोत्साहन विभाग (DPIIT) यांनी सूचित केल्यानुसार दिनांक २८/०२/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये उक्त अधिनियमांतर्गत देण्यात येणारा नोंदणी दाखला अर्ज प्राप्त झाल्यानंतर १ दिवसात देण्याबाबत तरतुद करण्यात आली आहे. तथापि, तदनंतर नोंदणी प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही ०१ दिवसांत न झाल्यास Deemed Approval ची तरतुद नियमात नाही. त्यामुळे सदर १ दिवसाचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर संबंधित आस्थापनेस स्वंयनिर्मित (Auto Generated) नोंदणी प्रमाणपत्र निर्गमित होणेसाठी संगणकीय प्रणालीमध्ये तसेच संकेतस्थळावर अनुषंगिक बदल करणे आवश्यक आहे. त्यास अनुसरुन शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

व्यवसाय सुलभीकरणांतर्गत DPIIT यांनी सुचविलेल्या सुधारणा तसेच महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे व सेवाशर्तीचे विनियमन) अधिनियम, २०१७ अंतर्गत आस्थापनेच्या नोंदणी संदर्भातील शासन निर्णय दिनांक ११/०३/२०१९ मधील ०१ दिवसांत सेवा पुरविण्याचा कालावधी

विचारात घेऊन, महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे व सेवाशर्तीचे विनियमन) नियम, २०१८ च्या नियम-५ अन्वये आस्थापनेस विहित कालावधीनंतर स्वंयनिर्मित (Auto Generated) नोंदणी प्रमाणपत्र उपलब्ध होण्यासाठी संगणकीय प्रणालीमध्ये तसेच संकेतस्थळावर आवश्यक ते अनुषंगिक बदल करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर शासन मान्यतेस अनुसरुन कामगार आयुक्त, मुंबई यांनी त्यांचे स्तरावरुन संबंधित संगणकीय प्रणाली तसेच संकेतस्थळावर आवश्यक ते अनुषंगिक बदल करण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६२७१५११५४७११० असा आहे. सदरचा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS

Digitally signed by SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=3389518a88af500ef17fd52858804c56d5b0db93ce68c9638764849614f0c8b3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=824DB7B32ED13AAC7B6F1F11E717770B52D6784F2BC41DDF0E4E9729CDB96F88, cn=SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
Date: 2024.06.27 15:22:34 +05'30'

**(स्वप्निल कापडणीस)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कामगार ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) कामगार आयुक्त, कामगार भवन, सी-२०, ब्लॉक-ई, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४०० ०५१.
४) सर्व अपर कामगार आयुक्त/ कामगार उप आयुक्त/सहाय्यक कामगार आयुक्त
५) निवडनस्ती (कामगार-१०)